२०११०११४१५४७५१००१

पिंपरी चिंचवड महानगरपालिका
आस्थापनेवरील आरोग्य अधिकारी व आरोग्य कार्यकारी अधिकारी या संवर्गातील पदे मंजूर करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

नगर विकास विभाग
शासन निर्णय क्र. पीसीसी ३००६/३८४९/प्र.क्र. १५५ /नवि २२
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक- २५ जून, २००७

वाचा :- १) आयुक्त, पिंपरी चिचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र. प्रशा/१अ/ कावि/ ४६०/२००५, दि. १२.७.२००५
२.आयुक्त, पिंपरी चिचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र. प्रशा/ १अ/ कावि/ ३१४९/ २००६, दि. १०.१०.२००६वत्यासोबतचा मनपा ठराव क्र. ५१९६ व क्र.५१५९,
३) आयुक्त, पिंपरी चिचवड महानगरपालिका यांचे पत्र क्र. प्रशा/ १अ/ कावि/ ७३/ २००५, दि. १३.०२.२००७

**प्रस्तावना-**

पिंपरी चिंचवड महानगरपालिकेच्या, आरोग्य विभागाचे कामकाज अधिक चांगल्या प्रकारे व दर्जेदार होण्यासाठी व महापालिकेचा क्षेत्रविस्तार आणि कामकाजावर नियंत्रण ठेवणेसाठी "आरोग्य कार्यकारी अधिकारी" या पदनामाचे रु. १०६५०-१५८५० या वेतनश्रेणीतील ५ पदे नव्याने निर्माण करण्याचा महापालिका ठराव क्र.५१५९, दिनांक ७/५/२००४ रोजी महापालिका सभेने पारित केला आहे. तसेच आरोग्य विभागातील आरोग्य निरिक्षकांची कमतरता व या पदाचे काम वाढल्याने आरोग्य निरिक्षक या पदाची शैक्षणिक पात्रता धारण करणा-या आरोग्य विभागातील कर्मचा-यांकडून "आरोग्य निरिक्षक" पदाचे काम करुन घेण्यात येत आहे. तथापी कामाचा व्याप व आरोग्य निरिक्षक पदाची गरज लक्षात घेवून ज्यांना असे काम दिलेले आहे त्यांच्यासाठी "आरोग्य निरिक्षक" या संवर्गाची रु. ५०००-८००० या वेतनश्रेणतील २० पदे नव्याने निर्माण करण्याचा महापालिका ठराव क्र.५१९६, दिनांक २०/५/२००४ रोजी महासभेने पारीत केला आहे .

उपरोक्त ठरावानुषंगाने त्यात नमूद केलेल्या पदांच्या आवश्यकतेनुसार आढावा घेवून आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका पिंपरी, पुणे यांनी महापालिकेच्या आस्थापनेवर आरोग्य निरिक्षकांची १४ पदे तर कार्यकारी आरोग्य अधिकारी या संवर्गाची ५ पदे नव्याने निर्माण करण्याचा प्रस्ताव सादर केला आहे. सदर प्रस्तावास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका, यांनी सादर केलेल्या प्रस्तावाची छाननी करुन आरोग्य विभागासाठी आरोग्य निरिक्षकांची रु. ५०००-८००० या वेतनश्रेणीतील १४ पदे निर्माण करण्यास, तसेच महापालिका मुख्यालय व स्वच्छता विषयक सर्व विभागांच्या पर्यवेक्षिय कामांसाठी आरोग्य वैद्यकिय अधिकारी (वरिष्ठ) यांच्या नियंत्रणाखाली "आरोग्य कार्यकारी अधिकारी" या पदनामाचे रु. १०६५०-१५८५० या वेतनश्रेणीतील १ पद निर्माण करण्यास मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ च्या कलम ५१ मधील तरतूदीच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

०४. आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका, पिंपरी यांनी प्रस्तुत प्रकरणी सर्व संविधानिक बाबींची पुर्तता करुन शासनास अहवाल पाठवावा.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या नावांने व आदेशानुसार,

( सुनिल कोठेकर )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रति,

१) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई ३२.
२) प्रधान सचिव, (२) (नवि), यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
३) आयुक्त, पिंपरी चिंचवड महानगरपालिका,पिंपरी, पुणे.
४) निवडनस्ती, नवि २२